सर्व शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र हिस्सा **लेखाशिर्ष २२०२ आय ४४१ आणि राज्य हिस्सा लेखाशिर्ष २२०२ आय४५२** खाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१८ / प्र.क्र. ०४ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०६ जून, २०१८.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.

२) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र. एसएसए-२०१८ /प्र.क्र.१५०/एसडी-१.

**शासन निर्णय-**

सर्व शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २२०२ , सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) लेखाशिर्ष (२२०२ आय४४१ ), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु. ११२.५० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना ( ४० टक्के राज्य हिस्सा ) लेखाशिर्ष ( २२०२ आय४५२ ) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकुण रु. ७५.०० कोटी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. वाचा क्र. २ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार मागणी क्र. टी-५, २२०२ , सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजनाए (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना**, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) (२२०२ आय४४१ ),** ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली केंद्र शासनाने रु.३६.७२ कोटी ( रुपये छत्तीस कोटी बाहत्तर लाख ) फक्त इतका निधी वितरीत केला असुन त्यास समरुप राज्य हिस्सा म्हणून **(०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना ( ४० टक्के राज्य हिस्सा ) ( २२०२ आय४५२ )** ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली **रु. २४.४८ कोटी ( रुपये चोवीस कोटी अठ्ठेचाळीस लाख फक्त )** इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

प्रकरणी नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९ / अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ नुसार प्राप्त अधिकार तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२९९/अर्थोपाय, दि.१८.०५.२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०६११३०३७५७२४असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: cn=Ravindra Digambarrao Aute, o=Tribal Development Department, ou=Government of Maharashtra, email=rajendra.aute@nic.in, c=IN
Date: 2018.06.06 17:32:37 +05'30'

**रविंद्र दि.औटे**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थ-१९ ) / ( व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.